**महासंचालक (न्यायिक व तांत्रिक) यांचे अधिनस्त न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक रासायनिक विश्लेषक,गट-ब या पदासाठी कमाल वयोमर्यादा निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.एफएसएल-०४१५/प्र.क्र.३७९/पोल-४,**
गृह विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २ फेब्रुवारी, २०१७.

वाचा :-१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही-२०१५ /प्र.क्र.४०४ /१२, दि.२५.४.२०१६.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही-२००४ /प्र.क्र.१९/ १२, दि.१७.८.२००४.

**प्रस्तावना:-**

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक) यांचे अधिनस्त न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक रासायनिक विश्लेषक,गट-ब या संवर्गातील पदासाठी दि.१९.३.१९७५ च्या अधिसूचनेन्वये सेवाप्रवेश नियम तयार करण्यात आले आहे. सदर सेवाप्रवेश नियमामध्ये सरळसेवेसाठी कमाल वयोमर्यादा ३० वर्षे अशी निश्चित करण्यात आली आहे. तद्नंतर सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.८.२००४ च्या शासन निर्णयान्वये ही वयोमर्यादा वाढवून ३३ वर्षे इतकी करुन भरती प्रक्रिया महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राबविण्यात आलेली आहे.शासनाने सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२५.४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये ही कमाल वयोमर्यादा ५ वर्षांने वाढवून ३८ वर्षे व मागास वर्गीयांसाठी ४३ वर्षे करण्यात आली आहे. त्यानुषंगाने या पदाच्या कमाल वयोमर्यादेमध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक) यांचे अधिनस्त न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सहायक रासायनिक विश्लेषक,गट-ब (राजपत्रित) ही पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सरळसेवेने भरण्याकरीता या पदासाठी खुल्या प्रवर्गातील उमेदवारांसाठी कमाल वयोमर्यादा ३८ वर्षे व मागासवर्गीय उमेदवारांसाठी कमाल वयोमर्यादा ४३ वर्षे इतकी करण्यात येत आहे.

२. सहायक रासायनिक विश्लेषक,गट-ब (राजपत्रित) या पदासाठीच्या प्रचलित व प्रस्तावित सेवाप्रवेश नियमात यथायोग्य बदल करण्यात यावे व अशी कार्यवाही पूर्ण होईपर्यंत सद्या सुरु असलेल्या व पुढे होणाऱ्या नेमणुका देखील या वाढीव वयोमर्यादेनुसार करण्यात याव्यात.

३. महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांनी यथायोग्य पध्दतीने हा बदल सर्वसंबंधीतांच्या निदर्शनास आणून दयावा व या निर्णयाच्या अनुषंगाने पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२०४१३०६०५२३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Somnath V Potare

Digitally signed by Somnath V Potare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d677dcd1bc3bed55a48ddbdaad925a6651c5d43a12d84cf305d3ff791ea7f16, cn=Somnath V Potare
Date: 2017.02.04 13:08:14 +05'30'

**(सोमनाथ पोटरे)**

अवर सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,
५. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
६. महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
८. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
१०.उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा,नागपूर,अमरावती,औरंगाबाद, नाशिक,पुणे,नांदेड,कोल्हापूर,
११.सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२/कार्यासन-१६ ब), मंत्रालय, मुंबई,
१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५.निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).